**अहिल्यादेवी महिला व बालक विकास मंडळ, पारवा, ता. जि. परभणी संचलित संत गाडगेबाबा माध्यमिक आश्रमशाळेस इ. ६ वी ते ७ वी चे वर्ग जोडण्यासाठी मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,

शासन निर्णय क्रमांकः विभशा २०१३/प्र.क्र. २२४/विजाभज-२

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २८ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना –**

अहिल्यादेवी महिला व बालक विकास मंडळ, पारवा, ता. जि. परभणी या संस्थेमार्फत चालविण्यात येणारी संत गाडगेबाबा माध्यमिक आश्रमशाळा साडेगाव, जि. परभणी या संस्थेच्या ठिकाणापासून ४-५ कि.मी. अंतरावर कोणतयाही प्रकारची शैक्षणिक सुविधा उपलब्ध नाही. म्हणून संचालक, विजाभज यांनी शिफारस स्थानिक ठिकाणची विजाभज प्रवर्गातील लोकसंख्या या बाबी विचारात घेऊन मागणीप्रमाणे खास बाब म्हणून ६ वी ते ७ वी चे वर्ग सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

अहिल्यादेवी महिला व बालक विकास मंडळ, पारवा, ता. जि. परभणी या संस्थेमार्फत चालविण्यात येणारी संत गाडगेबाबा माध्यमिक आश्रमशाळा साडेगाव, जि. परभणी या माध्यमिक आश्रमशाळेच्या ठिकाणापासून ४-५ कि. मी. अंतरावर कोणतीही सुविधा नाही. सदर आश्रमशाळेस इयत्ता ६ वी व ७ चे वर्ग जोडून देण्यास संस्थेने मागणी केलेली आहे. त्यानुसार संचालक, विजाभज यांनी केलेली शिफारस स्थानिक ठिकाणची विजाभज संवर्गातील लोकसंख्या व अपु-या असणा-या शिक्षणाच्या सुविधा इ. बाबी विचारात घेऊन इ. ६ वी ते ७ वी चे वर्ग अनुदानासह सदरहू माध्यमिक आश्रमशाळेस खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून जोडून देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर आश्रमशाळेत इयत्ता ६ वी व इयत्ता ७ वी मध्ये नियमानुसार अनुज्ञेय निवासी विद्यार्थी प्रवेशीत राहतील.

२. निवासी विद्यार्थ्यांना नियमानुसार अनुज्ञेय असलेले पारिपोषण अनुदान सन २०१४-१५ पासून अनुज्ञेय राहील.

३. नवीन वर्गवाढीमुळे प्रत्येक वर्गात १.३३ प्रमाणे अनुज्ञेय होणा-या शिक्षकांच्या ३ पदावर संस्थेतील, जिल्ह्यातील, विभागातील किंवा राज्यातील अतिरिक्त कर्मचा-यांच्या यादीमधून

सेवा ज्येष्ठ कर्मचा-यास मागासवर्गीयांचे आरक्षण विचारात घेऊन नियुक्ती देणे बंधनकारक राहील.

४. सदर संस्थेस इयत्ता ६ वी व ७ वी च्या वर्गाकरिता अनुज्ञेय असणारे इमारत भाडे देय राहील.

५. इयत्ता ६ वी व ७ चे वर्ग सदर संस्थेस जोडून दिल्यास येणारा खर्च सन २०१४-१५ या वर्षात मंजूर असलेल्या तरतुदीतून भागवावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ५८६/ व्यय-१४ दि. ०२.०८.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचया www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८२८१८५७२०५४२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Sonaji Choure

Digitally signed by Shivaji Sonaji Choure
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shivaji Sonaji Choure
Date: 2014.08.28 18:52:59 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**कार्यसन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, ३ चर्च रोड, पुणे -४११ ००१

२) प्रादेशिक उपायुक्त समाजकल्याण विभाग, औरंगाबाद

३) सहाय्यक आयुक्त समाजकल्याण विभाग, परभणी

४) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा वा लेखा अनुज्ञेयता) नागपूर

५) जिल्हा कोषगार अधिकारी, परभणी

६) मा. मंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव

७) संत गाडगेबाबा माध्यमिक आश्रमशाळा साडेगाव, ता. जि. परभणी

८) निवड नस्ती